**जिल्हा वार्षिक योजनेतुन मच्छिमार सहकारी संस्थांना सहाय्य योजने अंतर्गत अवरुध्द पाण्यात (नवीन निर्माण झालेल्या तलावात) मत्स्यबीज/झिंगाबीज संचयनास <u>मान्यता देणेबाबत.</u>**

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्र.मत्स्यवि- २४१०/५२७/प्र.क्र.१०४/१०/पदुम-१३,
मंत्रालय, मंबई ४०० ०३२.
दिनांक १८ सप्टेंबर,२०१०.

संदर्भः- नियोजन विभागाचे पत्र क्र.जिवायो-१००९/प्र.क.२१३/का १४८१, दि .३०.१२.२००९.

**<u>प्रस्तावना :-</u>**

पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या आरंभापासून अवरुध्द पाण्यात मत्स्यसंवर्धन ही योजना राज्यात राबविण्यात येत आहे. मत्स्यसंवर्धनास योग्य असलेल्या जलक्षेत्रात मत्स्यबीज संचयन करण्यात येऊन मत्स्यशेतीद्वारे गोडया पाण्यातील मत्स्योत्पादन वाढविणे हा या योजनेचा हेतू आहे. मत्स्यव्यवसाय विभागाकडून नवीन निर्माण होणा-या तलावात जलद वाढणाऱ्या जातीचे स्थानिकरित्या निर्माण केलेले मत्स्यबीज संवर्धकांना पुरवून तलाव /जलाशयामध्ये मत्स्यशेती करण्यास प्रोत्साहन देण्यात येते. राज्यामधील नवीन तयार झालेल्या तलावामध्ये जलद वाढणाऱ्या मत्स्यबीजाची शासनामार्फत साठवणूक करणेत येते. याचबरोबर विशेष घटक योजना आदिवासी विकास कार्यक्रमाअंतर्गत विशेष बाब म्हणून आदिवासी मच्छिमार संस्थेच्या ताब्यात असणाऱ्या तलावामध्ये संचयन करण्यांत येते.

जिल्हा वार्षिक योजना सर्वसाधारण संदर्भात नियोजन विभागाने पत्र क्र.जिवायो-१००९ /प्र.क्र.२१३/ का-१४८१, दिनांक ३० डिसेंबर २००९ अन्वये सन २०१०-११ मध्ये राबविण्यात येणार असलेल्या योजनांचे एकत्रिकरण केले असून योजनांशी संबंधित शासन निर्णय निर्गमित करण्याचे निर्देश दिले आहेत त्यानुसार मच्छिमार सहकारी संस्थांना सहाय्य या योजनेत एकूण ९ योजनांचा समावेश आहे. त्यामध्ये अवरुध्द पाण्यात मत्स्यसंवर्धन ही योजना अंतर्भूत करण्यात आली आहे. त्यामुळे सदर योजनेसंदर्भात सर्वसमावेशक शासन निर्णय निर्गमित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णयः-</u>**

आता या शासन निर्णयान्वये मच्छिमार सहकारी संस्थांना सहाय्य योजनेअंतर्गत अवरुध्द पाण्यात मत्स्यबीज/झिंगाबीज संचयन ही योजना यापुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर योजनेची अंमलबजावणी करताना पुढील निकष/मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्यात यावे.

**१) नव्याने निर्माण झालेल्या व विभागाकडे हस्तांतरीत झालेल्या पाटबंधारे तलावात विभागामार्फत मत्स्यबीज/झिंगाबीज संचयन-**

१.१ नव्याने निर्माण झालेल्या पाटबंधारे तलावात मत्स्यासाठा तयार होण्यासाठी सदर तलाव विभागाकडे हस्तांतरीत झाल्यावर त्यामध्ये विभागामार्फत मत्स्यबीज/झिंगाबीज संचयन करावे.

१.२ नवीन तलावाचे मासेमारी हक्क विभागाकडे हस्तांतरीत झाल्यावर शासनाच्या अद्यावत तलाव ठेका धोरणानुसार तलाव ठेका देण्यात यावा. जर तलाव ठेक्याने गेला नाही तर नियमानुसार तलावात मासेमारी परवाने देण्यात यावेत.

१.३ या नवीन तलावामध्ये जलक्षेत्रानुसार संचयन करण्यासंबधी शासन निर्णय क्र.मत्स्यवि-११९९/२०/प्र.क्र.८/पदुम-१३, दि.१५/१०/२००१ नुसार जलक्षेत्राच्या वर्गवारीनुसार निर्धारीत केलेल्या इष्टतम संचयनाच्या दरानुसार, सलग पाच वर्षे प्रत्यक्ष जलसाठयानुसार खालीलप्रमाणे मत्स्यबीज/ झिंगाबीज संचयन करण्यात यावे.

| **अ.क्र.** | वर्ष | विभागामार्फत संचयन | संस्थेमार्फत संचयन |
|---|---|---|---|
| **१** | २ | ३ | ४ |
| १ | पहिले | १००% | - |
| २ | दुसरे | १००% | - |
| ३ | तिसरे | ७५% | २५% |
| ४ | चौथे | ५०% | ५०% |
| ५ | पाचवे | २५% | ७५% |

१.४ तलावात झिंगाबीज संचयन करावयाचे असेल तर सर्वसाधारणपणे मत्स्यबीज ८०% व झिंगाबीज २०% संचयन करण्यात यावे. मत्स्यबीजाचा आकार ५० मि.मि. व त्यापेक्षा जास्त आणि झिंगाबीजाचा आकार ३० मि.मि.इतका असावा.

१.५ विभागामार्फत करावयाच्या मत्स्यबीज संचयनासाठी लागणारे मत्स्यबीज हे मत्स्यव्यवसाय विभागातंर्गत मत्स्यबीज केंद्रातून उपलब्ध करुन संचयन करण्यात यावे.

२. सर्वसाधारण योजना, विशेष घटक योजना, अदिवासी उपयोजना आणि आदिवासी क्षेत्राबाहेरील योजना या सर्व योजनांमध्ये वरीलप्रमाणे सलग पाच वर्षे संचयन करण्यात यावे. तसेच संस्थेने खालील अटींची पूर्तता करणे बंधनकारक राहिल.

२.१ संस्था कार्यान्वित असावी.

२.२ संस्थेचे लेखापरिक्षण नियमित करण्यात यावे.

२.३ संस्था थकबाकीदार नसावी.

२.४ संस्थेने मत्स्यबीज संचयन, मासे विक्री इत्यादीबाबत केलेल्या व्यवहाराच्या नोंदी वार्षिक अहवालात तसेच आर्थिक पत्रकात समाविष्ट करण्यात याव्यात.

२.५ तिसऱ्या ते पाचव्या वर्षाचे संचयन वरीलप्रमाणे संस्थेने करणे बंधनकारक राहील.

२.६ पुढील वर्षाचे संचयन करताना मागील वर्षीच्या संचयनामुळे झालेले मत्स्योत्पादन, संस्थेच्या सभासदांना प्रत्यक्ष मिळालेला रोजगार, संस्थेच्या आर्थिक परिस्थितीत झालेली सुधारणा या बाबत आढावा घेण्यात यावा.

३ एका तलावात विभागामार्फत मत्स्यबीज/झिंगाबीज संचयन सलग ५ वर्षे केल्यावर पुन्हा त्याच तलावात विभागामार्फत संचयन करण्यात येऊ नये.

४ पाच वर्षाच्या संचयन कालावधीत ठेकेदार संस्था बदलली अथवा तलाव ठेक्याने गेला नाही. तरी संचयन वरीलप्रमाणे पुढे चालू ठेवण्यात यावे.

५ कोणत्याही परिस्थितीत खाजगी व्यक्तीने ठेक्याने/लिलावाने घेतलेल्या तलावात विभागामार्फत संचयन करण्यात येऊ नये.

६ सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी त्यांच्या जिल्हयाचा परिपुर्ण प्रस्ताव प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय यांचेकडे विहित वेळेत सादर करावा.

७ विभागामार्फत व संस्थेमार्फत संचयन करताना सोबतच्या प्रपत्र-१ नमुन्यामध्ये संचयन पंचनामा करण्यात यावा. संचयनाबाबतच्या नोंदी संबंधित जिल्हा कार्यालयांनी सोबतच्या प्रपत्र-२ नमुन्यामध्ये ठेवाव्यात.

८ प्रादेशिक कार्यालयाच्या मंजूरीनंतरच सहाय्यक आयुक्त मत्स्यवयवसाय यांनी संचयनाबाबतची कार्यवाही करावी.

९ वरील अटी पूर्ण करणा-या प्रस्तावांची छाननी प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय यांनी शासन निर्णयातील सुचना व निर्देशांनुसार करावी . सदर योजने अंतर्गत उपलब्ध होणा-या तरतुदीच्या मर्यादेत संचयन प्रस्तावांना तांत्रिक मान्यता द्यावी. सविस्तर प्रस्ताव संबंधित जिल्हयाच्या जिल्हाधिका-यांना सादर करण्यात यावा. सदर प्रस्तावांना जिल्हाधिकारी यांनी प्रशासकीय मंजूरी प्रदान करुन निधीमुक्त करावा.

१० सदर योजने अंतर्गत करण्यात येणा-या संचयनाचे विहित नमुन्यात अभिलेख ठेवण्यात यावे व संचयनाबाबतचा विभागाचा एकत्रित अहवाल आयुक्त मत्स्यव्यवसाय, मुंबई यांना वेळोवेळी सादर करावा. मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थांना सहाय्य योजनेअंतर्गत अवरुध्द पाण्यात मत्स्यसंवर्धन सर्वसाधारण योजना, विशेष घटक योजना, अदिवासी उपयोजना आणि आदिवासी क्षेत्राबाहेरील योजना या घटकासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीतून संबंधित अर्थशीर्षातून खर्च करण्यात यावा.

११. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.२५४/१४३१, दिनांक १५.९.२०१० अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

सही/-
(ज.ल.पावरा)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग.

प्रति,
प्रधान सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव (कृषि विभाग), कृषि व पदुम विभाग, मुंबई-३२
आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
विभागीय आयुक्त, सर्व
जिल्हाधिकारी, सर्व
सर्व संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग
प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, सर्व
सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, सर्व.
महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई/२ नागपूर, महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,/निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व कोषागार अधिकारी.
निवड नस्ती.

**प्रपत्र-१**

**मच्छिमार सहकारी संस्थांना सहाय्य योजनेअंतर्गत अवरुध्द पाण्यात मत्स्यबीज/ झिंगाबीज संचयन पंचनामा**

**दिनांक / /**

आम्ही खालील पंच आज दिनांक / / रोजी सकाळ/दुपार/संध्याकाळ ________ वाजता ________ तलावावर समक्ष येऊन ________ मत्स्यव्यवसाय विभागामार्फत संचयन करावयाच्या मत्स्यबीज/झिंगाबीज याची पहाणी केली असता ते ____________ या जातीचे ___________ आकाराचे एकूण _____ नग जिवंत व सुस्थितीत असलेले बीज आमचे समक्ष वरील तलावात संचयन करण्यात आले आहे. म्हणून हा वस्तुस्थितीवर आधारीत पंचनामा आम्ही करुन त्यावर स्वाक्षरी केली आहे.

| **अ.क्र.** | पदनाम | पूर्ण नाव व शिक्का | स्वाक्षरी |
|---|---|---|---|
| १. | लाभार्थी संस्थेचे पदाधिकारी (२) | | |
| २. | ग्रामपंचायत सदस्य/सरपंच किंवा ग्रामसेवक | | |
| ३. | स.म.वि.अ. किंवा म.वि.अ. | | |

**टिप -: मत्स्यबीज व झिंगाबीज साठी स्वतंत्र पंचनामा करण्यात यावा.**

प्रतिस्वाक्षरी
सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय

**प्रपत्र-२**

## मच्छिमार सहकारी संस्थांना सहाय्य योजनेअंतर्गत अवरुध्द पाण्यात मत्स्यबीज/ झिंगाबीज संचयन तपशील.

| अ. क्र. | संचयन वर्ष | योजना | तलावाचे नाव | तालुका | जिल्हा | सरासरी जलक्षेत्र (हे.) | इष्टतम संचयन क्षमता (लक्ष) | ठेकेदार संस्थेचे पूर्ण नाव व पत्ता | ठेका कालावधी | संचयना वेळी तलावातील जलक्षेत्र (हे.) | संचयना वेळी पाण्याची सरासरी खोली | सदर योजने व्यतिरिक्त तलावात केलेले बीज संचयन (लक्ष) | सदर योजने अंतर्गत केलेले प्रत्यक्ष बीज संचयन (लक्ष) | बीज संचयन दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 | 12 | 13 | 14 | 15 |
| | | | | | | | | | | | | | | |
| एकूण | | | | | | | | | | | | | | |

---- ---- ----

---- ---- ----

| बीज संचयन प्रकार व जात | बीज संचयन आकार (मि.मी.) | बीजाचा स्त्रोत (नैसर्गिक/हॅचरी) व ठिकाण | बीजाचा दर | बीजाची एकूण किंमत | मंजूरी आदेश क्रमांक व दिनांक | अभिप्राय | स्वाक्षरी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १६ | १७ | १८ | १९ | २० | २१ | २२ | २३ |
| | | | | | | | |
| | | | | | | | |